सन २०१८-२०१९ मधील कांदा अनुदान आयसीआयसीआय बँकेकडे शिल्लक असलेल्या व त्यावर प्राप्त झालेल्या व्याजाच्या रकमेमधून वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

### सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग

### शासन निर्णय, क्रमांक:- सपस- २०२३/प्र.क. ७८ /२४ स

मंत्रालय, मुंबई ३२

दिनांक :- ६ एप्रिल, २०२३

संदर्भ:- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स.दिनांक २६ डिसेंबर, २०१८
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स. दिनांक ३१ जानेवारी, २०१९ व दिनांक १५ फेब्रुवारी, २०१६,
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस २०१८/प्र.क्र.३६७/२४ रा. दिनांक १६ फेब्रुवारी २०१९
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स. दिनांक ८ मार्च, २०१९
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- पूरक २०१९/प्र.क्र.२९/१७ स. दिनांक १० जुलै, २०१९
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:-पूरक-२०१९/प्र.क्र.७१ /२४ स. दिनांक ७ ऑगस्ट, २०१९
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- सपस २०१९/प्र.क्र.१२६/२४ स. दिनांक १९ ऑगस्ट, २०१९
८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक:- पूरक-२०१९/प्र.क्र.१०८/१७ स. दिनांक ०४ जानेवारी, २०२०
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
क्रमांक:- सपस २०२०/प्र.क.७१ /२४ स, दिनांक १६ जून, २०२०
१०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक :- पणन- १३ / कांदा अनुदान २०१८-१९/लक्ष्मीसोपानखाबास/२०२०,
दिनांक ३१/८/२०२०

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय, दिनांक २६ डिसेंबर, २०१८ अन्वये सुरुवातीस राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या व प्रसन्न कृषी मार्केट, पाडळीआळे या खाजगी बाजार समितीमध्ये १ नोव्हेंबर, २०१८ ते १५ डिसेंबर २०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या पात्र शेतकऱ्यांना रुपये २०० प्रति क्विंटल व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी या प्रमाणात अनुदान मंजूर करण्यात आले आहे. या योजनेंतर्गत कांदा अनुदानाचा कालावधी वेळोवेळी वाढविण्यात आला असून सुधारित अंतिम कालावधी दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ ते २८ फेब्रुवारी, २०१९ असा निश्चित करण्यात आला आहे.

कांदा अनुदान योजनेसाठी उपलब्ध करुन दिलेला निधी पुढीलप्रमाणे आहे:-

**(रुपये कोटीत)**

| शासन निर्णय, दिनांक | | उपलब्ध निधी | जिल्हा | लाभार्थी |
|---|---|---|---|---|
| १६/२/२०१९ | आकस्मिकता निधी | रुपये ११४.८००० | १७ जिल्हे | १,६०,६९८ |
| ७/८/२०१९ | पूरक मागणी | रुपये ३८७.३०३१ | १९ जिल्हे | ३,९३,३१७ |
| २४/१/२०२० | पूरक मागणी | रुपये २.३०२९ | २ जिल्हे | २,५३२ |
| १६/६/२०२० | आयसीआयसीआय बँकेकडे जमा झालेल्या व्याजामधून | रुपये ०.२७२३ | ४ जिल्हे | १७६ |
| १/११/२०२२ | पूरक मागणी | रुपये २.६४६० | १ जिल्हे | ११७२ |
| २१/३/२०२२ | पूरक मागणी | रुपये ७.४७०० | १ जिल्हे | ८०७४ |
| **एकूण** | | **रुपये ५१४.७९४३** | | **५,६५,९६९** |

शासन निर्णय, दिनांक १९/८/२०१९ अन्वये आयसीआयसीआय बँकेमार्फत कांदा अनुदान वितरित करण्यास मान्यता देताना वित्त विभागाने नमुद केलेल्या अटी व शर्तीमध्ये **अट क्रमांक II** पुढील प्रमाणे आहे:-

**अट क्रमांक II** "सदर बचत खात्यातून प्राप्त होणाऱ्या व्याजाचा वापर सदर योजनेच्या अंमलबजावणी करिताच करण्यात यावा."

आयसीआयसीआय बँकेमध्ये जमा केलेल्या निधीतून १६ मार्च , २०२२ अखेर रुपये ९९.५८ लाख इतकी रक्कम ( अखर्चित रक्कम व व्याज ) पणन संचालनालयाच्या खात्यात जमा झालेले आहे.

पणन संचालनालयाने दिनांक १०/१२/२०२० च्या पत्रान्वये सांगली जिल्ह्यातील ७६२ पात्र लाभार्थ्यांसाठी रुपये ७६,६४,३१४ इतका निधी उपलब्ध करुन देण्याची मागणी केली आहे.

वित्त विभागाने व्याजाची रक्कम योजनेच्या अंमलबजावणीकरिता वापरण्यास परवानगी दिलेली आहे. यास्तव पणन संचालनालयाच्या आयसीआयसीआय बँकेच्या खात्यात अखर्चित असलेली रक्कम आणि सदर रकमेवर प्राप्त झालेल्या व्याजाची रक्कम सांगली जिल्ह्यातील पात्र लाभार्थ्यांच्या कांदा अनुदानासाठी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयसीआयसीआय बँकेच्या खात्यात अखर्चित असलेली रक्कम आणि सदर रकमेवर प्राप्त झालेल्या व्याजाचा विनियोग कांदा अनुदानासाठी करणे आवश्यक असल्याने, सांगली जिल्ह्यातील पात्र लाभार्थ्यांचे प्रलंबित कांदा अनुदान आयसीआयसीआय बँकेच्या खात्यात अखर्चित असलेली रक्कम आणि सदर रकमेवर प्राप्त झालेल्या व्याजातून वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान आयसीआयसीआय बँकेमार्फत अदा करण्यात यावे.

३. सांगली जिल्ह्यासाठी वितरित करावयाच्या कांदा अनुदान तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **लाभार्थी संख्या** | **वितरीत करावयाचे अनुदान** |
|---|---|---|---|
| १ | सांगली | ७६२ | ७६,६४,३१४ |
| **एकूण** | | **७६२** | **७६,६४,३१४** |

४. सदर अनुदान वितरित केल्याचा अहवाल पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी १ महिन्यात शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०४०६१४३२१२०२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2023.04.06 14:38:30 +05'30'

**(डॉ. सुग्रीव धपाटे)**

**सहसचिव (पणन), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

1. मा. मंत्री (सहकार व पणन ) मंत्रालय, मुंबई.

II. मा. राज्यमंत्री (पणन) मंत्रालय, मुंबई,
III. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
IV. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
V. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
VI. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय , मुंबई
VII. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई
VIII. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
IX. कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
X. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
XI. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
XII. विभागीय उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे
XIII. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सांगली
XIV. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
XV. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
XVI. लेखा कोषागार अधिकारी, पुणे.
XVII. अवर सचिव (१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
XVIII. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.